**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री किसान सन्मान निधी (PM-KISAN) योजनेसाठी बँक खाते उघडण्यास मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. किसयो-२०१९/प्र.क्र.२० (भाग-३)/११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०१९

संदर्भ :-
१. केंद्र शासनाच्या सचिव, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय भारत सरकार, यांचे पत्र क्र.एफ नं.१-१/२०१९-क्रेडिट.१, दि.०१.०२.२०१९.
२. शासन परिपत्रक क्र.किसयो-२०१९/प्र.क्र.२०/भाग-१/११-अे, दि.०४.०२.२०१९
३. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना
४. सचिव (कृषि) यांचे पत्र क्र.किसयो-२०१९/प्र.क्र.२०/११-अे, दि.०९.०२.२०१९
५. शासन निर्णय क्र.किसयो-२०१९/प्र.क्र.२०/भाग-४/११-अे, दि.१५.०२.२०१९

## प्रस्तावना :-

शेतकऱ्यांना निश्चित उत्पन्न मिळण्याकरीता केंद्र शासनाने **प्रधानमंत्री किसान सन्मान निधी (PM-KISAN) योजना** वरील संदर्भ क्र. १ व ३ अन्वये सुरू केली आहे. सदर योजना केंद्र शासनाने विहित केलेल्या निकषांनुसार आणि यासंदर्भात वेळोवेळी केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निदेशाप्रमाणे राज्यात राबविण्यास मंत्रीमंडळाच्या दि.०४.०२.२०१९ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता प्रदान केली असून त्यानुसार संदर्भ क्र. ५ अन्वये शासन निर्णय निर्गमित केला आहे. सदर योजनेसाठी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या सविस्तर मार्गदर्शक सूचनांनुसार आयुक्त (कृषि) यांचे स्तरावर दोन स्वतंत्र बँक खाती उघडण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यास अनुसरून खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांचे उत्पन्न वाढविण्यासाठी केंद्र शासनाने सुरु केलेली १०० टक्के केंद्र पुरस्कृत **प्रधानमंत्री किसान सन्मान निधी (PM-KISAN) योजना** राज्यामध्ये अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या संदर्भ क्र. ३ येथील मार्गदर्शक सूचनांनुसार महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजनेच्या (मनरेगा) धर्तीवर एक व सदर योजनेसाठी राज्यस्तरावर स्थापन करण्यात येणा-या प्रकल्प सनियंत्रण कक्षाच्या खर्चासाठी एक अशी एकूण दोन स्वतंत्र संयुक्त बचत खाती आयुक्त (कृषि) यांचे नावे सेट्रल बँक ऑफ इंडीया, पुणे येथे उघडण्यास खालील अटी व शर्तीस अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

१) प्रधानमंत्री किसान सन्मान निधी (PM-KISAN) योजनेची राज्यामध्ये अंमलबजावणी करण्यासाठी आयुक्त (कृषि) यांचे नावे सेट्रल बँक ऑफ इंडीया, पुणे येथे उघडण्यात येणा-या संयुक्त बचत

खात्यातील रक्कमेचा वापर हा केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री किसान सन्मान निधी या योजनेच्या अंमलबजावणीकरीता म्हणजेच पात्र लाभार्थ्यांना आर्थिक सहाय्य देण्याच्या प्रयोजनार्थ करण्यात यावा. तसेच सदर खात्यातून मिळणा-या व्याजाचा वापर सदर योजनेच्या अंमलबजावणीकरीता करण्यात यावा.

२) प्रधानमंत्री किसान सन्मान निधी (PM-KISAN) योजनेसाठी राज्यस्तरावर स्थापन करण्यात येणा-या प्रकल्प सनियंत्रण कक्षाच्या खर्चासाठी आयुक्त (कृषि) यांचे नावे सेट्रल बँक ऑफ इंडीया, पुणे येथे उघडण्यात येणा-या संयुक्त बचत खात्यातील रक्कमेचा वापर या योजनेची प्रभावी अंमलबजावणी करण्याकरीता स्थापन करण्यात येणा-या राज्यस्तरावरील प्रकल्प संनियंत्रण कक्षाच्या प्रशासकिय खर्चासाठी करण्यात यावा. तसेच सदर खात्यातून मिळणा-या व्याजाचा वापर सदर योजनेच्या अंमलबजावणीकरीता करण्यात यावा.

३) सदर योजनेकरीता प्राप्त होणारे अनुदान त्या त्या वित्तीय वर्षात खर्च करणे बंधनकारक राहिल व त्यापुढे शासनाच्या मंजूरीने मुदतवाढीकरीता खर्च करता येईल. ज्या प्रकरणी मुदतवाढ दिलेली नाही, अश्या प्रकरणी सदर बँक खात्यातील अखर्चित रक्कमा शासनाकडे समायोजित करणे आवश्यक राहिल.

४) सदर बँक खात्यातील व्यवहाराचे मासिक / तिमाही ताळमेळ करणे तसेच लेखा परिक्षण करणे आवश्यक राहिल.

५) सदरचे बँक खाते बंद करण्यात आल्यास, त्यामधील शिल्लक रक्कमेचा ताळमेळ घेऊन अखर्चित रक्कम योग्य त्या शासन लेखाशिर्षाखाली तात्काळ जमा करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहिल.

प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३७४/१४३१ दिनांक ७/२/२०१९ व ३८१/१४३१ दिनांक १३/२/२०१९ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४७ व ४८/२०१९/कोषा प्रशा-५, दिनांक १४/२/२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१९०२१५१३४११४२६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Dr.Kiran Patil
Date: 2019.02.15 13:44:33 +05'30'

**( किरण पाटील )**
**उप सचिव (कृषि), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव

२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
३. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
४. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
५. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
६. अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
७. अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. अप्पर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१०. सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. अप्पर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
१३.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४.सर्व जिल्हाधिकारी
१५.सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१७.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१८. निवड नस्ती, (११-अे).